<u>ग्रंथ निवड समितीची पुनर्रचना.</u>

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : मराग्रं२५१९/प्र.क्र.३१/२०१५/साशि-५**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक : ३० डिसेंबर, २०१६

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय क्र. IB २५६२-A दि. ५ जुलै, १९६३
२) शासन निर्णय क्र. ग्रंवियो २३६९/अ, दि. ३ जानेवारी, १९७०
३) शासन निर्णय क्र. १०९९/४९८८९/(७००)/साशि-५, दि. १९ मार्च, २००३
४) शासन निर्णय क्र. मराग्रं-२०१०/(२३८/१०)/साशि-५, दि. १२ सप्टेंबर, २०११
५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र-प्रवास-१०१०/प्र.क्र.२/सेवा-५, दि. ३ मार्च, २०१०
६) प्र. ग्रंथालय संचालक यांचे पत्र क्र. जा.क्र.४/ग्रं.नि.समिती-पुनर्रचना/२०१४-१५/१७७४७, दि. ०१/०१/२०१५
७) ग्रंथालय संचालक यांचे पत्र क्र. ४/ग्रंनिसपु/२०१५-१६/२९२६०, दि. ३१/०३/२०१६
८) ग्रंथालय संचालकांचे पत्र क्र. ४/ग्रंनिसपु/२०१६-१७/९८६४, दि. २४/१०/२०१६

**<u>प्रस्तावना :</u>**

महाराष्ट्र सार्वजनिक ग्रंथालये अधिनियम १९६७ मधील प्रकरण ३ कलम ९ पोटकलम (२)(अ)(क)(ड) अन्वये करण्यात आलेले महाराष्ट्र सार्वजनिक ग्रंथालये नियम १९७० मधील प्रकरण ४ नियम २२ (ब) व अनुसुची नमुना ब मधील (५) अनुसार ग्रंथ निवड समितीची प्रस्थापना करण्याबाबतची तरतूद आहे. राज्यात प्रकाशित झालेल्या मराठी भाषेतील विषयावरील उपयुक्त ग्रंथाची निवड करून यादी करण्याचे काम या समितीकडून करण्यात येते. त्यानुसार संदर्भाधिन शासन निर्णय दि. २२ सप्टेंबर, २०११ अन्वये ग्रंथनिवड समिती गठित करण्यात आली होती. सदर समितीची मुदत पहिल्या बैठकीपासून ३ वर्षे होती. त्यानुसार समितीचा कालावधी दि. १९/१०/२०१४ रोजी संपुष्टात आलेला आहे. त्यामुळे सदर समितीची पुनर्रचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

ग्रंथनिवड समितीची खालीलप्रमाणे पुनर्रचना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| प्रतिनिधीचे नाव | पद |
|---|---|
| **श्रीमती अरूणा ढेरे** | **अध्यक्ष** |
| **साहित्य संस्थामधून शिफारस केलेले प्रतिनिधी** | |
| श्री. शशिकांत सावंत, मुंबई | सदस्य |
| डॉ. रामचंद्र देखणे, पिंपरी-चिंचवड | सदस्य |
| श्री. श्रीपाद प्रभाकर जोशी, चंद्रपूर | सदस्य |
| **शासनाने नियुक्त केलेले प्रतिनिधी (अशासकीय)** | |
| श्री. आनंद हर्डीकर, पुणे | सदस्य |
| प्रा. सुभाष आठवले, ग्रंथपाल, सीएचएम महाविद्यालय, ठाणे | सदस्य |
| श्री. सुरेश मारोतीराव जंपनगिरे, परभणी | सदस्य |

| | |
|---|---|
| श्री. नंदन रहाणे, नाशिक | सदस्य |
| श्री. किशोर कदम, मुंबई | सदस्य |
| डॉ. देविदास वायदंडे, पुणे | सदस्य |
| श्रीमती. मिना वैशंपायन, मुंबई | सदस्य |
| डॉ. कुमार शास्त्री, नागपूर | सदस्य |
| श्री. शाम जोशी, बदलापूर | सदस्य |
| **राज्य ग्रंथालय संघाचे विभागवार प्रतिनिधी** | |
| श्री. राम देशपांडे (अमरावती विभाग) | सदस्य |
| श्री. डी. बी. देशपांडे (औरंगाबाद विभाग) | सदस्य |
| श्री. शिवकुमार शर्मा (नागपूर विभाग) | सदस्य |
| श्री. केशवराव कोतवाल (नाशिक विभाग) | सदस्य |
| श्री. हरिदास रणदिवे (पुणे विभाग) | सदस्य |
| श्री. उदय सबनीस (मुंबई विभाग) | सदस्य |
| **शासकीय सदस्य** | |
| संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य | सदस्य सचिव |

२. सदर समितीची मुदत समितीच्या पहिल्या बैठकीपासून तीन वर्षे राहील. समितीच्या प्रतिवर्षी किमान २ बैठका अध्यक्षांच्या अनुमतीने घेण्यात येतील.

३. समितीची कार्यपध्दती व इतर बाबी या विषयीची नियमावली सदस्यांच्या माहितीकरिता सोबत जोडली आहे.

४. ग्रंथनिवड समिती ही राज्यपातळीवरील समिती समजण्यात यावी. समितीच्या अशासकीय सदस्यांचा प्रवासभत्ता व दैनिकभत्ता संदर्भाधिन क्रमांक ५ च्या शासन निर्णयातील नियमानुसार मंजूर करण्याबाबतची कार्यवाही संचालक, ग्रंथालय संचालनालय यांचेकडून करण्यात येईल व याकरिता होणारा खर्च “मागणी क्र.डब्ल्यू-४,२२०५ कला व संस्कृती, १०५ सार्वजनिक ग्रंथालय (०१) ग्रंथालय संचालनालय (०१) (०१) ग्रंथालय संचालनालय योजनेत्तर खर्च (२२०५०२५१), ११ प्रवास खर्च ”, या लेखाशिर्षांतर्गत भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१२३०१६१७३३०४०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Suvarna Hemchandra Patankar

Digitally signed by Suvarna Hemchandra Patankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Edu, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed71ebecc5e77faa2bc326ad6465ee69e8ce4b095cb873186b176c646b34cc28, serialNumber=3740f7b9e520ea4fc9d0c8cae45a7132db5b499301d6caff46360639be7adc8b, cn=Suvarna Hemchandra Patankar
Date: 2016.12.30 16:20:19 +05'30'

**( सु. हे. पाटणकर )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री, यांचे खाजगी सचिव

२) मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव

३) मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव

४) प्रधान सचिव (उवतंशि) यांचे स्वीय सहाय्यक

५) सर्व उप सचिव (उच्च व तंत्र शिक्षण विभाग)

६) ग्रंथालक संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई

७) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे

८) महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर

९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर,

१०) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई

११) समितीचे सर्व सदस्य (ग्रंथालय संचालकांमार्फत)

१२) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई (प्रसिध्दीसाठी)

१३) निवडनस्ती (साशि-५).